ई-साहित्य प्रकाशन

# ई-शाळा



प्रवेश : मोफत

जागा : नेहमीच उपलब्ध

वय : मर्यादा नाही

फी : शिकण्याची जिद्द

डोनेशन : अमर्यादित उत्साह

संपर्क : eshaala@gmail.com

९८६९६७४८२०



लेखिका : भारती सरमळकर



मराठी माणसाचं आपल्या भाषेवर खुप प्रेम आहे. आपल्या आईप्रमाणेच. आणि ही आई आहेही सर्वगुणसंपन्न. सर्व प्रकारच्या गुंतागुंतीच्या भावना व्यक्त करायला समर्थ. ज्ञानेश्वर तुकोबांपासून ते आजवरच्या कवी लेखकांपर्यंत असंख्य लेणी ल्यायलेली ही माय. आणि जगभर पसरलेली तिची लेकरं. मराठीतलं साहित्य, ज्ञान, काव्य, शास्त्र, विनोद यांना तोड नाही. कोणी कितीही म्हटलं तरी आपल्या भाषेतलं साहित्य वाचताना जसं मनाला भिडतं वा खळखळून हसवतं तसं उसन्या भाषेबाबत नाही होऊ शकत. मराठी लिपीसारखी शास्त्रशुद्ध उच्चारांवर आधारित लिपी कोणतीच नाही हे आधुनिक काळात सिद्ध झाले आहे. सर्व प्रकारची आव्हानं स्विकारायला ही भाषा सिद्ध आहे. पण ...

पण आताच्या ग्लोबलायझेशनच्या काळात मराठी मागे पडते आहे. इंटरनेटच्या युगात मराठी दिसेनाशी होईल की काय अशी भिती वाटायला लागली आहे. अशा वेळी या आईला गरज आहे ती तिच्या लेकरांच्या स्पर्शाची. आपण निदान आपल्या मराठी माणसांना लिहायची मेल , पत्र तरी मराठीत लिहूया ? आपले ब्लॉग, स्क्रॅप, वॉल, ट्वीट तरी मराठीत लिहूया. आपले अनुभव मराठी डायरीत नोंदवूया. इंटरनेटवर जागोजाग मराठी भाषा दिसावी. मराठीतून कविता, ई बुक्स यांची प्रचंड निर्मिती व्हावी. त्या वाचल्या जाव्यात. सहज उपलब्ध व्हाव्यात. आपल्या भावना मराठीतून नेमकेपणी मांडल्या जाव्यात. जुन्या नव्या लेखकांचं साहित्य मराठी इंतरनेटवर उपलब्ध व्हावं. आणि होता होता मराठी साहित्याचा सुकाळु सुरू व्हावा. ई ग्रंथनिर्मितीचा विराट यज्ञ उभा रहावा. जगभरात मराठीचा वापर व्हावा.

या साठी हे एक पहिलं बालपाऊल टाकतो आहोत. हे खरंच एक बालपाऊल आहे. कोवळं. धडपडणारं. पण पडल्यानंतरही उभं रहाणारं. त्या बालपावलांपासून स्फ़ुर्ती घेऊन आपणही आज मराठी गमभनची सुरूवात करू या. शपथपुर्वक मराठीचा वापर सुरू करूया. इतरांना प्रेरित करू या. जगभरात जिथे जिथे म्हणून मराठी माणूस आहे त्या प्रत्येक कोनाकोनाड्यात इंटरनेटच्या माध्यमातून जाऊ या. मराठीचा भूतकाळ सोनेरी होता. भविष्य अधिकच उज्ज्वल असेल. पण त्यासाठी वर्तमानात काम करायचे आहे.

चला. सुरुवात करू या !

--- नाम गुम जायेगा


वर्ग – पहिला
इंटरनेटवर मराठी टायपिंग
: धडा पहिला :
गुगल ट्रान्सलिटरेशन लिंक

आज ब-याच दिवसांनी G-Talk वर आले. हम्म्म्म हि शलाका काही दिसत नाहीय ऑनलाईन. मला वाटतं Geneva मध्ये गेल्यावर हि विसरलीच आम्हा सर्वांना. शलाका आणि मी शाळा, कॉलेज एकत्रच केलं आमची मैत्री अधिक दृढ आणि घट्ट झाली ती कवितांमुळे. दोघीनाही कविता करण्याच भारी वेड. कुणाला काही सुचलं कि लगेच एकमेकांना ऐकवायचं मग त्यावर चर्चा करायची. हा आमचा रोजचा कार्यक्रम....छंदच होता म्हणा हव तर... पण शलाका आमची मुलखाची आळशी... तिच्या कवितांना लिहायचं काम माझ असायचं... शलाका लिहायचा नेहमीच आळस करायची. मग तिच्या सर्व कविता मी लिहून देत असे... तिला खूप आवडे......

हम्म्म्म बराच वेळ झाला हि अजून काही ऑनलाईन दिसत नाहीय...पण आता आमच्या ह्या Lazy Bones ला कोण बरं कविता लिहून देत असेल? तिने कविता लिहिणं थांबवलं तर नसेल ना? छे छे असं कसं बरं होईल... Geneva त गेल्या पासून ह्या बाईचा एक फोन सुद्धा नाही आला... फक्त एकदा एक इमेल केलेला कि मी सुखरूप पोहचले म्हणून ....बस्स ..... मी आपली रोज ऑनलाईन येऊन तिची वाट पाहते ... विशेषत: एखादी नवीन कविता लिहिली कि शलाका आठवतेच आठवते....

रविवारचा दिवस असेल ... संध्याकाळी जरा चहा पिऊन झाल्यावर म्हटलं नवीन कविता लिहून काढूयात म्हणून laptop चालू केला... G -Talk वर आले आणि अहो आश्चर्य चक्क शलाका ऑनलाईन होती.... खूप आनंद झाला. सर्वात पहिला तर तिचा खरपुस समाचार घेतला ... कुठे होतीस इतके दिवस? फोन नाही केलास? कशी आहेस? सर्व व्यवस्थित तर आहे न? एक न दोन मी तर प्रश्नांची सरबत्तीच चालू केली... पण शलाका मात्र शांत.... मी विचारलं, का गं काय झालं? सर्व ठीक आहे न तिकडे? तर म्हणाली अगं तुमच्या सर्वांची खूप आठवण येते ग? मीही काही क्षण गप्प गार झाले ..... काय लिहावे कळेना ... मग म्हटल अगं वेडाबाई आपले शब्द आपल्या कविता आहेत कि आपल्या सोबती त्यांच्या समोर मोकळं करायचं आपल मन .... आठवणी सगळ्या कागदावर लिहून काढ न... तरीही शलाका उदासच होती .... म्हणाली अग तुला वाचून दाखवायची सवय झालेली न आता कशी वाचू? आणि कोण ऐकणार? मेल करणार होते पण तुला माहिती आहे न माझ्या सर्व कविता तूच लिहून द्यायचीस आणि मी तर सर्व इथे सर्व कविता इंग्रजीतल्या मराठीत लिहून काढल्यात.... मराठी इंटरनेटवर कस टाईप करतात हे मला माहीतच नाहीय ग? .... मी अगदी मोठ मोठ्याने हसले.... म्हटल हात तिच्या इतकंच न ....

त्यात काय एवढं रडायचं वेडाबाई , आता मराठी लिहायला तुला माझी गरज नाही लागणार....अग इंटरनेटवर आजकाल इतके फ्री सॉफ्टवेअर्स आणि लिंक्स उपलब्ध आहेत ज्यांच्या मदतीने आता तू सुवाच्य, शुद्ध मराठीत टाईप करू शकतेस आणि तुझ्या कविता माझ्या पर्यंत पोहोचवू शकतेस... कविताच काय तू इमेल्स, chat हे देखील मराठीत करू शकतेस..... :-) :-) :-)
शलाकाच्या इथून एक दोन तीन खूप खूप smiley आले... हेहेहेहेहे खूप खुश झाली ती हे ऐकून. मला म्हणाली चल आताच शिकव मला....

*************************************************

हे एक प्रातिनिधिक स्वरूपाच दोन मैत्रिणींच संभाषण आम्ही आपल्या समोर आणलं..पण शलाका सारखे असे बरेच लोक आहेत ज्यांना अजूनही संगणक किंवा इंटरनेटवर मराठीत टायपिंग कस करायचं हे माहित नाही. गोष्ट अगदी साधी सोप्पी पण विचार करायला लावणारी नाही का?

**ई-साहित्य प्रतिष्ठान** आपल्या जगभर पसरलेल्या आणि मराठीचा श्वास घेणाऱ्या असंख्य मित्र-मैत्रीणीना संगणक आणि इंटरनेटवर मराठीत टायपिंग कस करायचं याच एक साधं, सरळ आणि सोप तंत्र सांगणार आहे.. चला तर शलाका बरोबर आपण सर्वच ह्या ई-शाळेत भरती होऊयात...हसत खेळत इंटरनेट आणि संगणक ह्यावर मराठी टायपिंग शिकुयात .... येताय न मग आमच्या ई-शाळेत .... इथे शिक्षक शिक्षिका नाहीत, फर्स्ट लास्ट बेंच नाही कि क्रमवारी नाही... हि आहे एक मुक्त..... सर्वांसाठी असलेली, सर्वांची आपली ई-शाळा जिथे आहेत इंटरनेट व संगणकावर मराठी टायपिंग शिकण्याची प्रबळ इच्छाशक्ती असलेले आपले असंख्य मित्र-मैत्रिणी आणि आहे ई-साहित्य प्रतिष्ठानचा एक ध्यास....एक दृढ निश्चय.... उपलब्ध लिंक्स/सोफ्टवेअर्स आपल्या पर्यंत साध्या, सरळ आणि सोप्या स्वरूपात पोहचवण्याचा.

इंटरनेटवर मराठी टायपिंगच्या भरपूर लिंक्स आहेत आणि बर्याच असतीलही पण इथे आपण सुरुवात करणार आहोत ते सगळ्यात सोप्या आणि साध्या लिंक ने ....

**http://www.google.co.in/transliterate/indic/marathi**

संगणकावरील इंटरनेट एक्स्प्लोरर चालू केल्यावर जिथे address bar असतो तिथे वरील लिंक जशीच्या तशी कॉपी करून पेस्ट करायची आणि मग एंटर करा आणि चमत्कार !!!!!!! युरेका युरेका अस चक्क ओरडत सुटाल.... हे हे हे **Googletransliteration** हो हाच तो चमत्कार अन युरेका ! आता एंटर केल्यावर तुमच्या स्क्रीनवर एक खिडकी उघडेल .... खाली दाखविल्याप्रमाणे :



# वापर

खाली दिलेल्या चित्रात गुगल ट्रान्सलिटरेशन टूलबार आणि त्याचे महत्वाचे फंकशन्स दाखविले आहेत.



# भाषा निवड

एडीट टूलबारच्या अगदी डाव्या बाजूला तुम्हाला "select language" म्हणजेच भाषा निवड हे फंक्शन दिसेल. तिथे एक ड्रोप डाऊन लिस्ट असेल. गुगल ट्रान्सलिटरेशन ज्या ज्या भाषांमध्ये ट्रान्सलिटरेट करू शकते त्या सर्व भाषा त्या लिस्ट मध्ये उपलब्ध आहेत. तिथे "मराठी" भाषा सिलेक्ट करा. बस एवढंच .... झाल तुमच सर्व काम सोप्प आता.



# फोनेटीकली टायपिंग

चला आता तुम्ही मराठीत टायपिंग करू शकता अगदी सहज आणि सोप्या रीतीने... एकदा का तुम्ही एडीट टूलबारमधून मराठी भाषा निवडलीत कि तुम्ही मराठी टायपिंगला सुरुवात करायची .... कशी? अरे एकदम easy आहे... एखादा शब्द मराठीत जसा ऐकायला येतो न तो अगदी तसाच इंग्लिश मध्ये टाईप करायचा. शब्द टाईप करून झाला कि स्पेस बार दाबा आणि चमत्कार !!! तो शब्द अगदी जसाच्या तसा मराठीत रुपांतरीत होतो... हो कि नाही? आहे न एकदम easy... हे हे हे चला तर प्रक्टिस करा चला चला.....

उदा :

marathi - मराठी

indiyaa / india - इंडिया

bharat – भारत

maharashtra - महाराष्ट्र

अरे वाह !! तुम्ही तर फार फास्ट शिकलात कि........ आहे कि नाही एकदम सोप्प........आता वळूयात एका खूप उपयोगी फंक्शनकडे.

# करेक्टिंग  आणि एडिटिंग

गुगल ट्रान्सलिटरेशन मध्ये टाईप केलेला शब्द हा ९९% आपल्याला हवा तोच रुपांतरीत होऊन येतो परंतु कधी कधी  असं  होतं कि आपल्याला हवा असलेला शब्द रुपांतरीत शब्दापेक्षा वेगळा असतो तेव्हा गुगल ट्रान्सलिटरेशन आपल्याला त्याच  शब्दाचे इतर  अनेक रुपांतरीत शब्द सुचवतो.  टाईप  केलेल्या  शब्दावर क्लिक केलात किंवा शब्दाच्या शेवटी जाऊन बॅकस्पेस दिलत कि ती सूची तुम्हाला स्क्रीन वर दिसेल. मग तुम्हाला जो हवा तो शब्द त्या सूचीतून तुम्ही निवडू शकता....



**Correcting and editing words**

In most cases, the transliterated word is correct. However, sometimes the transliteration may not be what you were looking for. In order to give you more control, Google transliteration provides a list of suggestions that you can select from. You can bring up the suggestion menu by clicking on the word or by hitting the BACKSPACE key at the end of the word (note that if there is a space after the word, you will need to backspace twice) or by CLICKING on the word. For example:



If the suggestion menu still does not give you the word you are looking for, Google Transliteration provides an advanced editing option in which you can construct the word character by character. See the section below on advanced editing options for details.

# अॅडव्हान्स एडिटिंग ऑपशन्स

जर तुम्हाला हवा असलेला शब्द त्या सूचित नसेल तर???? हम्मम्म्म अहा एवढा विचार नका करू.... खाली दाखवलेली खिडकी म्हणजे एक जादूची छडी आहे..... इथे हि जादूची छडी वापरायची ........ तीच नाव आहे ...." advanced editing options"



जिथे तुम्ही तुम्हाला हवा असलेला शब्द चक्क बनवू शकता ........ आहे न जादू....... एक एक अक्षर घेऊन, स्पेशल कॅरेक्टर्स वापरून इथे तो नवीन शब्द बनवता येतो.... अगदी तुम्हाला हवा तसा... टूल बारमध्ये सगळ्यात उजव्या बाजूला Ω हे चिन्ह असलेल आयकोन असेल. हे आहे कॅरेक्टर सिलेक्टर Ω ह्या आयकोन वर क्लिक केलत कि तुम्हाला तुमच्या भाषेतील उपलब्ध कॅरेक्टर्स ची लिस्ट येईल .... इथे तुम्हाला हवा तो शब्द तुम्ही चक्क बनवू शकता.... आहे न जादूची छडी .... पूर्ण शब्द तयार झाला कि ओके वर क्लिक करा आणि तुमचा शब्द मुख्य एडिटिंग खिडकीत पेस्ट होईल.

काय शिकलात न जादू आणि ते हि किती फटाफट.... ह्या जादूच्या छडीमुळे किती सोप्प होत न आपल्याला हवे असलेले अवघड शब्द सहज बनवण... इथे तुम्हाला हवे असलेले तुमच्या भाषेतील सर्व कॅरेक्टर्स उपलब्ध आहेत. जेणेकरून तुम्हाला कुठल्याही शब्दामुळे अडायला नको कि थांबायला नको .....

आता आम्ही तुम्हाला आणखी एक मस्त सुपर फास्ट शोर्ट कट देतोय .... जर तुम्हाला मराठीत टायपिंग करता करता एखादा इंग्लिश शब्द टाईप करायचा असेल किंवा मग इंग्लिश मध्ये टाईप करता करता एखादा मराठी शब्द टाईप करायचा असेल तर एक साधा सोपा आणि सुपर फास्ट शोर्ट कट आहे ........... कोणता? .... simple very simple  हे जस मी टाईप केल न आता मध्येच इंग्लिश मध्ये आणि मग लगेच मराठीत टायपिंग चालू केल ....  अस करण्यासाठी फक्त CONTROL + G  प्रेस करा आणि तुम्ही हव तेव्हा मराठीत टायपिंग करू शकता आणि हव तेव्हा इंग्लिश मध्ये ते हि तुमच टायपिंग चालू असताना....... आहे न एकदम शोर्ट कट......

आता आणखी एक गंमत किंवा दुसरा पर्याय म्हणा हव तर................. SHIFT + SPACE हो हाच आहे तो दुसरा पर्याय... एखादा शब्द टाईप करून झाला कि लगेच SHIFT+SPACE प्रेस करा (नुसत SPACE प्रेस करण्या ऐवजी) ह्याने तुमचा शब्द हा रुपांतरीत होत नाही त्याच भाषेत राहतो ज्यात तुम्ही टाईप केला आहे. <u>उदा:</u> जर तुम्हाला "Google" हा शब्द इंग्लिश मध्ये ठेवायचा असेल तर "Google" टाईप केल्यावर लगेच SHIFT+SPACE प्रेस करा (नुसत SPACE प्रेस करण्या ऐवजी) "Google" इंग्लिशमध्येच राहील त्याच मराठीत रूपांतरण होणार नाही. हा पर्याय अंकांसाठी सुद्धा वापरला जातो.

# शब्दकोश

आता तुम्हाला जाडजूड डिक्शनरया घेऊन बसायची अजिबात गरज नाही... गुगल ट्रान्सलिटरेशन चा स्वतःचा असा शब्दकोश (डिक्शनरी) आहे आणि तो हि चक्क टूलबारवर...हा शब्दकोश वापरायचा असेल तर सर्व प्रथम ज्या शब्दाचा अर्थ हवा आहे तो शब्द हायलाईट करायचा आणि मग टूलबारवर उजव्या बाजूला शब्दकोशाचा आयकोन आहे (लाल रंगाचा) त्यावर क्लिक करा आणि मग गुगल शब्दकोश तुम्हाला त्या हायलाईटेड शब्दाचे सर्व उपलब्ध अर्थ दाखवेल.

उदा:

“गंमत” हा शब्द मराठीत आहे आणि तुम्हाला ह्याचा इंग्लिश अर्थ हवा असेल तर "गंमत" हा शब्द सर्वप्रथम हायलाईट करा, गुगल शब्दकोशच्या आयकोन वर क्लिक करा आणि तुम्हाला "गंमत" ह्या शब्दाचे इंग्लिश मधील सर्व अर्थ मिळतील. "गंमत" - amusement, drollery, banter, frolic, fun, lark, sport, wantonness.... त्याचप्रमाणे एखाद्या इंग्लिश शब्दाचा मराठी अर्थ तुम्ही गुगल शब्दकोश मध्ये शोधू शकता.

हम्म्म्म उंचावल्यात न भुवया.... वाटलेलंच....


गुगल शब्दकोश
उदाहरण
Define
Translate
गंमत
Translate
From Marathi
To English
swap
गंमत
1. Amusement
2. Banter
3. Drollery
4. Frolic
5. Fun
6. Lark
7. Sport
8. Wantonness
Powered by Google Dictionary
Done
ई-शाळा | वर्ग-पहिला |इंटरनेटवर मराठी टायपिंग

## गुगल ट्रान्सलिटरेशन हे खालील साईट्स वर उपलब्ध आहे....

१) GMail

२) Knol

३) API

४) Orkut Scraps

५) Blogger

६) Bookmarklet

चला तर आता शलाका सारखे आपले जे जगभर पसरलेले मित्र मैत्रिणी आहेत न ज्यांना इंटरनेटवर मराठी टायपिंग कस करायचं हा प्रश्न दिवस रात्र सतावत होता त्यांना आपण ह्या ई-शाळेतून आज हि जादूची छडी दिलीय....... अहा हि छडी लागे छम छम नाही आहे.... तर कमी वेळात साध्या सोप्या शब्दात त्यांना इंटरनेटवर मराठी टायपिंग शिकवणारी "जादूची छडी" आहे.... जिच नाव आहे "गुगल ट्रान्सलिटरेशन" "Googletransliteration" आणि हि छडी मिळवायची असेल तर त्याची एक साधी सोपी खाली दिलेली लिंक आहे.

http://www.google.co.in/transliterate/indic/marathi

आपला हा सगळा ई-शाळेचा पहिल्या जादूच्या छडीचा अभ्यास आम्ही ह्याच "गुगल ट्रान्सलिटरेशन" लिंकवर टाईप करून आपल्या समोर आणला आहे... तेव्हा तुम्हाला आता कळलंच असेल कि इंटरनेटवर मराठी टायपिंग कारण किती सोप आहे ते.... नाही का?

इंटरनेटवर गुगल ट्रान्सलिटरेशन सारख्या अजूनही बऱ्याच फ्री लिंक्स आहेत, सॉफ्टवेअर्स आहेत ज्याच्या मदतीने आपण मराठी टायपिंग करू शकतो. उदाहरणार्थ :

१) बरहा, २) श्री , ३) ग म भ न , ४) लीपिकार , ५) मायबोली

आणि किती तरी ज्यांची कदाचित आम्हाला माहितीही नसेल ...... तुम्हाला आणखी काही लिंक्स, सॉफ्टवेअर्सची माहिती आहे का? मग आमच्याशी share करायला आवडेल का? चला तर आम्ही वाट पाहतोय तुमच्या इमेल्सची, तुमच्याकडे असलेल्या माहितीची, तुमच्या सूचनांची, प्रतिक्रियांची जेणेकरून थोड्या दिवसांनी प्रत्येक मराठी माणूस इंटरनेटवर अगदी सहज आवडीने मराठी टायपिंग करायला लागेल आणि एक नाही दोन नाही तीन नाही तर त्याच्याकडे मराठी टायपिंगचे एकाहून एक पर्याय उपलब्ध असतील.

चला तर आपण सर्व जण मिळून ई-शाळेचा हा पहिला वर्ग "इंटरनेटवर मराठी टायपिंग" यशस्वी करूयात.... येताय न मग ?

ईमेल – eshaala@gmail.com